**विभागीय चौकशी प्रकरणात अपचाऱ्याच्या वतीने सेवानिवृत्त अधिकारी/ कर्मचारी यांना "बचाव सहायक" म्हणून काम करण्यास परवानगी देण्यासंबंधीच्या अटी व शर्ती.**

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक: वशिअ-१२१५/प्र.क्र.७९/११**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२

दिनांक - ७ ऑक्टोबर, २०१५

**वाचा** - १) शासन अधिसूचना, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक: सीडीआर-१००८/प्र.क्र.४५/ ०८/ ११, दिनांक १ एप्रिल, २०१०

महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ मधील तरतुदीनुसार शासकीय कर्मचारी यास त्याच्या वतीने विभागीय चौकशीचे प्रकरण सादर करण्यासाठी सेवानिवृत्त कर्मचाऱ्याची "बचाव सहायक" म्हणून मदत घेण्यास परवानगी देण्यात आली आहे. यासंबंधीच्या नियम ८ मध्ये संदर्भाधीन अधिसूचनेन्वये सुधारणा करण्यात आली असून त्यानुसार याबाबतीत सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे विनिर्दिष्टपणे विहित केलेल्या शर्तींच्या अधीन राहून सेवानिवृत्त कर्मचाऱ्याची बचाव सहायक म्हणून मदत घेण्याची तरतूद आहे.

२. या तरतुदीनुसार, सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांची बचाव सहायक म्हणून नियुक्ती करण्यासाठी शर्ती विहित करण्याची बाब विचाराधीन होती. आता, विभागीय चौकशीच्या प्रकरणी शासकीय कर्मचाऱ्यास सेवानिवृत्त कर्मचाऱ्याची **"बचाव सहायक"** म्हणून मदत घेण्याची परवानगी खालील अटी व शर्तींच्या अधीन देण्यात यावी असे विहित करण्यात येत आहे:

(१) असा सेवानिवृत्त कर्मचारी राज्य शासनाच्या सेवेतून निवृत्त झालेला असला पाहिजे. मात्र त्याच्या विरूद्ध सेवेत असताना/ सेवानिवृत्तीनंतर कोणतीही विभागीय चौकशी झालेली नसावी/ प्रस्तावित नसावी, आणि अशा कार्यवाहीच्या अनुषंगाने त्याला कोणतीही शिक्षा झालेली नसावी.

(२) अशा सेवानिवृत्त कर्मचाऱ्याचा प्रवासभत्ता, दैनिकभत्ता इ. खर्च अपचारी कर्मचाऱ्यास स्वत: करावा लागेल.

(३) बचाव सहायक म्हणून काम करणाऱ्या व्यक्तीने चौकशीच्या तारखांना व ठिकाणी वेळेवर हजर राहिले पाहिजे. याबाबतची जबाबदारी अपचारी कर्मचाऱ्याची असेल.

(४) अशा सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्याच्या संबंधित प्रकरणाशी चौकशीच्या कोणत्याही टप्प्यात अथवा त्याच्या अधिकृत कामाचा भाग म्हणून कोणत्याही प्रकारे संबंध आलेला असता कामा नये.

(५) अशा सेवानिवृत्त शासकीय कर्मचाऱ्यास एकाच वेळी जास्तीत जास्त पाच प्रकरणांमध्ये बचाव सहायक म्हणून काम करता येऊ शकेल. त्यांच्याकडे पाचपेक्षा जास्त प्रकरणे नाहीत याबद्दल त्यांनी चौकशी अधिकारी यांच्याकडे प्रतिज्ञापत्र दिले पाहिजे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१५१००७१३४९३५१४०७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

BHAT VENKATESH MADHAV

Digitally signed by BHAT VENKATESH MADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMIN DEPT,CID - 916890, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6e277c9088a4cb8b53e535a4642a6800b908c5dbdb3a63175760874eba717ae1, cn=BHAT VENKATESH MADHAV
Date: 2015.10.07 13:52:23 +05'30'

**( व्यं. मा. भट )**

**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. राज्यपालांचे सचिव
२. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
३. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
४. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव
५. सर्व मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव/ स्वीय सहायक
६. *प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ शाखा), मुंबई/नागपूर/औरंगाबाद
७. *प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई/ नागपूर/औरंगाबाद
८. *प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई/ नागपूर/औरंगाबाद
९. *प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई
१०.* सचिव, महाराष्ट्र विधानसभा सचिवालय, मुंबई
११.* सचिव, महाराष्ट्र विधानपरिषद सचिवालय, मुंबई
१२.*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
१३.*आयुक्त, राज्य निवडणूक आयोग, मुंबई
१४.सर्व मंत्रालयीन विभाग,
१५.सर्व मंत्रालयीन विभागाच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख/ कार्यालय प्रमुख,
१६.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रती)
१७.विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती)
१८. सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
१९.निवडनस्ती

*पत्राने.